**संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांचे कार्यालयाकडून जमा होणाऱ्या रकमाकरिता सुधारित लेखाशिर्षाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र.६८ /नवि-२०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०६ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना** :-

संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांचे कार्यालयाकडून जमा होणाऱ्या रकमा "नगर विकास विभाग, ००७० इतर प्रशासकीय सेवा -६० इतर सेवा, ८०० इतर जमा रक्कम (अकरा) अग्निसंरक्षण आणि नियंत्रण, ००७००११६" या जमा लेखाशिर्षामध्ये जमा करण्यात येते, परंतु वरिष्ठ लेखा अधिकारी, महालेखापाल कार्यालय, मुंबई यांनी सदर जमा लेखाशिर्षाचे वर्गीकरण चुकीचे असल्याचे कळविले असून या लेखाशिर्षाऐवजी ००७०-Other Administrative Service, ६०-Other Services, १०९-Fire Protection Control असे सुधारित जमा लेखाशिर्ष सुरू करण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, मुंबई तसेच प्रादेशिक अग्निशमन केंद्रामध्ये आयोजित होणाऱ्या विविध अग्निशामक प्रशिक्षण पाठयक्रमाचे प्रशिक्षण शुल्क, सेवा शुल्क, गुणपत्रिका / प्रमाणपत्र शुल्क, स्थानिक नागरी स्वराज्य संस्थांकडून राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्रास प्राप्त होणारे वार्षिक अनुदान, इत्यादी रकमा जमा करण्यात येतात. जमा बाबींचे वर्गीकरण सुलभ होण्यासाठी खालीलप्रमाणे सुधारित जमा लेखाशिर्ष सुरू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

मुख्य लेखाशिर्ष ००७० - इतर प्रशासकीय सेवा,
उप मुख्यलेखाशिर्ष ६०-इतर सेवा,
गौण शिर्ष १०९- अग्निसंरक्षण आणि नियंत्रण
गट शिर्ष ००
संगणक संकेतांक ००७०५०२९०१

२. हा शासन निर्णय प्रधान महालेखाकार (लेखा / हकदारी)- I यांचे संदर्भ क्र.ख.वि/ चा-१/नगर विकास विभाग/ यूओआर-२३/२०१६-१७/३७६, दि.१४.०७.२०१६ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५९६/अर्थ-११, दिनांक २५.११.२०१६ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२०६१५१८५५०७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.02.06 15:24:06 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
८) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
९) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
१०) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
११) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ (पूर्व), मुंबई
१२) कक्ष अधिकारी (वित्त विभाग, अर्थ-११)
१३) निवडनस्ती (नवि-२०).